**राज्य स्तरावर क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे**
**आयोजनाकरिता निधी वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१६ /प्र.क्र.१५४ /क्रीयुसे -२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १२ डिसेंबर, २०१६.

वाचा-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२३१/क्रीयुसे-१, दि. १३.०२.२०१४
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०१६ / प्र.क्र ८९ /अर्थसं-३, दि.२०.०४.२०१६.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र.शिक्रीपी/तरतुद/राक्रीशि/निवि/२०१५-१६/०२५७ का-६, दि.०८.०७.२०१६.

प्रस्तावना -

महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण २०१२ मध्ये राज्य स्तरावर क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन करण्याबाबत तरतुद आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरील क्रीडा शिबिराचे आयोजन या योजनेस मान्यता देण्यात आली असुन या योजनेंतर्गत १५ खेळ प्रकारातील खेळांसाठीच्या सुविधा व निवास सुविधा उपलब्धतेनुसार तालुका/जिल्हा/विभागीय क्रीडा संकुल/शिवछत्रपती क्रीडा नागरी संकुल,महाळुंगे,पुणे येथे करण्यात येते.

उपरोक्त संदर्भाधीन क्र.०३च्या पत्रान्वये सन २०१६-१७ या वर्षामध्ये खेळाडूकरिता राज्यस्तरीय क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन करण्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने या योजनेतंर्गत सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सन २०१६-१७ या वर्षा मध्ये राज्यस्तरीय क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन करण्यारिता रु.१९६.२९ लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु.१५७.०३ लक्ष इतकी रक्कम वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “२२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (०९) खेळाडूंना शिष्यवृत्त्या व पुरस्कार (०९)(१६)राज्य स्तरावर क्रीडा प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन (२२०४ ५६२६) ३१, सहायक अनुदान (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदी मधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. सदर योजनेअंतर्गत खेळाडू / प्रशिक्षणार्थी व शिबीर मार्गदर्शक यांचे पात्रताबाबतचे संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र ५ व ६ मधील निकष व इतर अटी व शर्ती लागू राहतील.

४. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१ . वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.
४.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.५. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ व दि.२४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११३१३२००९९७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Suryakant Pradhan

Digitally signed by Prashant Suryakant Pradhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f741f305e0506537a7efc111fdb5be9b1db4013bb8fe7a516ce30b694acca8f, cn=Prashant Suryakant Pradhan
Date: 2017.01.13 13:28:04 +05'30'

**( प्र.सू.प्रधान )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
८) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे .
१०) निवडनस्ती, क्रीयुसे-२.